सिडकोच्या मालमत्तेवर नवी मुंबई
महानगरपालिकेमार्फत आकारण्यात
येणा-या मालमत्ता करात सूट देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
क्रमांक : सिआयडी १०९७/प्र.क्र.३४८/नवि-१०,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १३ जानेवारी,२००३.

पहा : १) मुख्य प्रशासकीय अधिकारी,सिडको यांचे मा.मंत्री, नगर विकास यांना लिहिलेले पत्र क्र.सिडको/ ९७५/(युओ)/ प्रशासन/९४/३३१, दिनांक २२.४.१९९४

२) व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांचे अ.शा.प.क्र.सिडको/ व्यसं/मालमत्ता/२००२/४१४, दिनांक १३ नोव्हेंबर,२००२

३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे अ.शा.प.क्र.नमुंमपा/ कनिसं/२३७८/२००२, दिनांक १८.११.२००२

**प्रस्तावना :**

नवी मुंबईचा नियोजनबध्द विकास करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६च्या कलम ११३(१) अन्वये मार्च,१९७१ मध्ये सिडकोची नवनगर विकास प्राधिकरण म्हणून नियुक्ती केलेली आहे. त्यानुसार नवी मुंबई क्षेत्रासाठी सिडको हे नियोजन प्राधिकरण असुन नवी मुंबई क्षेत्रामध्ये सिडकोने पायाभूत सुविधा उपलब्ध करुन दिलेल्या आहेत. डिसेंबर,१९९१ मध्ये नवी मुंबई महानगरपालिकेची स्थानिक प्राधिकरण म्हणून स्थापना करण्यात आलेली आहे. नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रामध्ये सिडकोने विकसित केलेल्या ठाणे तालुक्यातील क्षेत्राचा समावेश आहे. महानगरपालिका स्थापन झाल्यानंतर मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १२९ मधील तरतूदींनुसार महापालिका क्षेत्रात असणा-या मालमत्तांवर नवी

मुंबई महानगरपालिकेने मालमत्ता कर आकारण्यास सुरुवात केली व सिडकोच्यासुध्दा सर्व मालमत्तांवर मालमत्ताकर आकारण्यास सुरुवात केली. नवी मुंबई क्षेत्रामध्ये पायाभूत सुविधा सिडकोने पुरविलेल्या असल्यामुळे महानगरपालिका सिडकोच्या मालमत्तेवर मालमत्ता कर आकारु शकत नाही असे सिडकोचे म्हणणे होते. त्यामुळे या प्रकरणी शासनाने उचित आदेश पारित करावेत अशी विनंती सिडकोने शासनास केली होती.

सिडकोने केलेल्या विनंतीवर नवी मुंबई महानगरपालिकेचे अभिप्राय घेण्यात आले व या प्रकरणी शासन, सिडको व नवी मुंबई महानगरपालिका यांची एकत्रित बैठक दिनांक ६.१.२००३ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत झालेल्या चर्चेस अनुसरुन शासनाने सिडकोच्या मालमत्तांवर नवी मुंबई महानगरपालिकेने कर आकारणी करण्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

## शासन निर्णय :

अ) सिडकोच्या स्वतःच्या कार्यालयाकरिता तसेच सिडकोच्या कर्मचा-यांसाठी कर्मचारी निवासस्थान म्हणून वापरात असणा-या इमारतींवर मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १३३ (३) मधील तरतूदींनुसार सामान्य कर आकरण्यात यावा.

ब) मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १३५ मधील तरतूदीनुसार सिडकोच्या मालमत्तांना पाणीपट्टी आकरण्यात यावी तसेच मलप्रवाह कर हा उक्त अधिनियमाच्या कलम १३७ (२) च्या तरतूदी अन्वये आकरण्यात यावा.

क) भाडे खरेदी तत्वावर विकलेल्या मिळकतीवरील मालमत्ता कर संबंधित भोगवटादारांकडून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम १२९ अन्वये वसुल करावा. यावाबत सिडकोने भाडे खरेदी तत्वावर विकलेल्या मिळकतीची माहिती मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ८ मधील कराधान नियम क्र.१ व २ मधील तरतूदीनुसार महानगरपालिकेस द्यावी.

ड) बांधकाम पूर्ण झालेल्या परंतु अद्याप विक्री न झालेल्या मालमत्तांवर सामान्य कराच्या १५ टक्के दराने कर आकारण्यात यावा. सदर कर सन २००२-२००३ या वित्तीय वर्षापासून आकारण्यात यावा.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ च्या कलम १५९-ए खालील परिशिष्ट १ मधील नियम क्र.७ मधील तरतुदीनुसार शासनास प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( राजीव जाधव )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.राज्यमंत्री (न.वि.) यांचे खाजगी सचिव
व्यवस्थापकीय संचालक, सिडको,निर्मल, नरिमन पॉईंट,मुंबई
आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका,सि.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई
कार्यासन- नवि २४
निवडनस्ती (नवि-१०)